**प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत- प्रति थेंब अधिक पीक घटकाच्या निधीमधून यवतमाळ जिल्हयातील बेंबळा प्रकल्पांतर्गत डेहणी उपसा सिंचन योजना व लोअर वर्धा प्रकल्पांतर्गत आर्वी उपसा सिंचन योजना या अंतर्गत सन २०१९-२० या वर्षात सुक्ष्म सिंचन कार्यक्रमासाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: प्रकृसिं-१०१९/प्र.क्र.२४५/१४अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक: २० नोव्हेंबर, २०१९.

**संदर्भ:-**

१. मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली,दि.२७ सप्टेंबर, २०१८ रोजी आयोजित बैठकीचे कार्यवृत्त.
२. कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांकः प्रकृसिं-०११९/प्र.क्र.४१ (भाग-१)/१८/१४अे, दि.११ ऑक्टोबर, २०१९.
३. कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांकः प्रकृसिं-०११९/प्र.क्र.४१(भाग-२)/१८/१४अे, दि.३० ऑक्टोबर, २०१९.
४. कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्रमांकः प्रकृसिं-०११९/प्र.क्र.४१/१८/१४अे, दि.११ नोव्हेंबर, २०१९.

**प्रस्तावना :-**

प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत- प्रति थेंब अधिक पीक घटकाच्या निधीमधून, यवतमाळ जिल्हयातील बेंबळा प्रकल्पांतर्गत डेहणी उपसा सिंचन योजना व लोअर वर्धा प्रकल्पांतर्गत आर्वी उपसा सिंचन योजना या अंतर्गत सूक्ष्म सिंचनाचा कार्यक्रम राबविण्यासाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत तसेच सदर उपलब्ध होणाऱ्या निधीमधून अनुदान वितरणाची कार्यपद्धती विहित करण्याबाबत मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि. २७ सप्टेंबर, २०१८ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीमध्ये, डेहणी उपसा सिंचन योजना व आर्वी उपसा सिंचन योजना या अंतर्गत राबवावयाच्या सूक्ष्म सिंचन कार्यक्रमासाठी त्या-त्या आर्थिक वर्षात आवश्यक असलेला निधी जलसंपदा विभागाने निश्चित करुन सदर निधीच्या मागणीचा प्रस्ताव कृषी विभागाकडे सादर करण्याचे निर्देश मा. मुख्य सचिवांनी दिले. त्यानुसार, यवतमाळ जिल्हयातील बेंबळा प्रकल्पांतर्गत डेहणी उपसा सिंचन योजना व निम्न वर्धा प्रकल्पांतर्गत आर्वी उपसा सिंचन योजना या अंतर्गत राबवावयाच्या सुक्ष्म सिंचन कार्यक्रमासाठी अनुक्रमे रु.९१३.५७ लक्ष व रु.१३७१ लक्ष असा एकूण रु.२२८४.५७ लक्ष निधी सन २०१९-२० या वर्षात प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना- प्रति थेंब अधिक पीक (सुक्ष्म सिंचन) यामधून उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव जलसंपदा विभागाने सादर केला आहे. जलसंपदा विभागाच्या प्रस्तावानुसार, केंद्र शासनाने सन २०१९-२० या वर्षासाठी प्रधानमंत्री कृषि

सिंचन योजना- प्रति थेंब अधिक पीक (सुक्ष्म सिंचन) अंतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या पहिल्या हप्त्याच्या निधीमधून केंद्र हिश्श्याचा रु.१३७०.७४२ लक्ष व आवश्यक समरुप राज्य हिश्श्याचा रु.९१३.८२८ लक्ष असा एकूण रु.२२८४.५७ लक्ष निधी उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

१. यवतमाळ जिल्हयातील बेंबळा प्रकल्पांतर्गत - डेहणी उपसा सिंचन योजना व निम्न वर्धा प्रकल्पांतर्गत आर्वी उपसा सिंचन योजना या अंतर्गत सन २०१९-२० या वर्षात सूक्ष्म सिंचन कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यासाठी, प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेच्या -प्रति थेंब अधिक पीक (सुक्ष्म सिंचन) घटकाच्या निधीमधून रु.२२८४.५७ लक्ष निधी (अक्षरी रुपये बावीस कोटी चौऱ्याऐंशी लाख सत्तावण्ण हजार फक्त) उपलब्ध करुन देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधीमध्ये प्रकल्पनिहाय केंद्र राज्य हिश्श्याच्या निधीचे प्रमाण पुढीलप्रमाणे आहे.

(रुपये लाखात)

| अनु.क्र | प्रकल्प | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण |
|---|---|---|---|---|
| १. | बेंबळा प्रकल्प- डेहणी उपसा सिंचन योजना | ५४८.१४२ | ३६५.४२८ | ९१३.५७ |
| २. | निम्न वर्धा प्रकल्प- आर्वी उपसा सिंचन योजना | ८२२.६० | ५४८.४० | १३७१ |
| | **एकूण** | **१३७०.७४२** | **९१३.८२८** | **२२८४.५७** |

३. सदर निधी आयुक्त (कृषि) यांनी संदर्भाधीन दि.११ ऑक्टोबर, २०१९, ३० ऑक्टोबर, २०१९ व दि.११ नोव्हेंबर, २०१९ च्या शासन निर्णयान्वये वितरीत केलेल्या निधीमधून जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, यवतमाळ व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, वर्धा यांना उपलब्ध करुन द्यावा.

४. जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी, यवतमाळ व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, वर्धा यांनी त्यांना उपलब्ध करुन दिलेला निधी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ यांना उपलब्ध करुन द्यावा.

५. अनुसूचित जमाती प्रवर्गाचा राज्य हिश्श्याचा आवश्यक निधी संबधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांनी जिल्हा विकास निधीमधून उपलब्ध करुन घेऊन संचालक, विदर्भ पाठबंधारे विकास महामंडळ यांना उपलब्ध करुन द्यावा.

६. सदर निधीमधून प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना- प्रति थेंब अधिक पीक (सुक्ष्म सिंचन) घटकाच्या मार्गदर्शक सुचनांमधील निकषानुसार सुक्ष्म सिंचन संच बसविण्यासाठी लाभार्थ्यास ५ हेक्टरच्या मर्यादेत, अल्प व अत्यल्प भुधारक शेतकऱ्यांना ५५% व इतर शेतकऱ्यांना ४५ % मर्यादेत अनुदान देण्यात यावे.

७. डेहणी उपसा सिंचन योजना व आर्वी उपसा सिंचन योजना या अंतर्गत सूक्ष्म सिंचन योजनेचा लाभ घेऊ इच्छिणाऱ्या सर्व शेतकऱ्यांनी ई-ठिबक आज्ञावलीवर अर्ज करावेत. त्यासाठी

महामंडळ/कृषी विभाग यांच्या अधिकाऱ्यांनी सर्व शेतकऱ्यांना सूचना द्याव्यात. तसेच सदर शेतकऱ्यांना देण्यात येणाऱ्या अनुदानाची रक्कम सूक्ष्म सिंचन संच बसविणाऱ्या कंपनीस अदा करण्याबाबतचे सदर शेतकऱ्यांचे संमतीपत्र घेण्यात यावे.

८. ई-ठिबक आज्ञावलीवर प्राप्त सर्व शेतकऱ्यांची यादी जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी यांनी महामंडळाचे संबंधित कार्यकारी अभियंता यांना उपलब्ध करुन द्यावी.

९. महामंडळाच्या संबधित कार्यकारी अभियंता यांनी सर्व अर्जदार शेतकऱ्यांच्या शेतात संबंधित कंपनीकडून सूक्ष्म सिंचन संचाची उभारणी करुन घेण्याची कार्यवाही करुन त्याबाबतचा अहवाल जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी, यवतमाळ/वर्धा यांना सादर करावा.

१०. महामंडळाच्या कार्यकारी अभियंता यांच्याकडून सूक्ष्म सिंचन संच उभारणी अहवाल प्राप्त झाल्यानंतर, जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी, यवतमाळ/वर्धा यांनी संबंधित अधिकाऱ्यांकडून मोका तपासणी करुन घ्यावी व देय अनुदानाच्या आवश्यक रकमेची परिगणना करुन महामंडळाच्या कार्यकारी अभियंता यांना कळविण्यात यावी.

११. जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी, यवतमाळ/वर्धा यांनी परिगणित केल्यानुसार अनुदानाची रक्कम संबंधित कंपनीस अदा करण्याबाबतची कार्यवाही महामंडळाने करावी. अनुदानाची रक्कम कंपनीस अदा केल्यानंतर सर्व शेतकऱ्यांना एसएमएस द्वारे त्यांना देय अनुदानाची रक्कम कंपनीस अदा केल्याबाबत कळविण्यात यावे.

१२. महामंडळास अदा केलेली रक्कम आर्थिक वर्षात खर्च करुन सदर रक्कमेचे उपयोगिता प्रमाणपत्र महामंडळाने पुढील आर्थिक वर्षाच्या एप्रिल महिन्याच्या अखेर पर्यंत जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी, यवतमाळ/वर्धा यांचेकडे सादर करावे.

१३. सदर निधीचे विनियोजन करताना प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना- प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) घटकाच्या केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांचे व त्या अंतर्गत विहीत विविध निकषांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

१४. सूक्ष्म सिंचन संचाची उभारणी कृषी आयुक्तालययाकडे नोंदणीकृत असलेल्या सूक्ष्म सिंचन संच उत्पादक कंपनीकडून करणे बंधनकारक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९११२०१२०३२३८७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2019.11.20 12:07:11 +05'30'

**(श्रीकांत आंडगे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) सचिव (कृषी), मंत्रालय, मुंबई-३२.

२) प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

३) सचिव (ला.क्षे.वि.), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४) आयुक्त (कृषि), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५) संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६) जिल्हाधिकारी ,यवतमाळ, जिल्हाधिकारी कार्यालय, यवतमाळ.
७) जिल्हाधिकारी ,वर्धा, जिल्हाधिकारी कार्यालय, वर्धा.
८) संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
९) विभागीय कृषी सहसंचालक, अमरावती/नागपुर.
१०) जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी, यवतमाळ/वर्धा
११) जिल्हा कोषागार अधिकारी, यवतमाळ/वर्धा
१२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण) महाराष्ट्र -१/२ मुंबई/नागपुर
१३) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
१४) संचालक, लेखा व कोषागार, मुंबई.
१५) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई, वाशी.
१६) उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपुर
१७) उप संचालक, लेखा व कोषागारे कोकण/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपुर
१८) सर्व कार्यासने व पर्यवेक्षिय अधिकारी (कृषी) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
१९) निवडनस्ती.